राज्य महिला सन्मान व जिल्हा
महिला सन्मान पुरस्कार.

# महाराष्ट्र शासन
## महिला व बाल विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१८८/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख-१८ मार्च, २०१५.

वाचा :-

केंद्र शासनाचे अ.शा. पत्र क्रमांक १९-१/२०१४-डब्ल्यूडी/आयसी, दि.५ सप्टेंबर, २०१४.

प्रस्तावना -

केंद्र शासनच्या महिला व बालविकास विभागाने उपरोक्त संदर्भीय पत्रान्वये राज्यामध्ये राज्य महिला सन्मान व जिल्हा महिला सन्मान पुरस्कार सुरु करण्याबाबत निर्देश दिले होते. त्यास अनुसरून केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशानुसार राज्यामध्ये राज्य महिला सन्मान व जिल्हा महिला सन्मान पुरस्कार सुरु करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावावर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय-

केंद्र सरकारने दि. ८ मार्च या महिलादिनी राज्य महिला सन्मान व जिल्हा महिला सन्मान हे दोन पुरस्कार जाहीर केले आहेत. केंद्र शासनाने जाहीर केलेले सदर दोन्ही पुरस्कार राज्यामध्ये सन २०१५-१६ पासून देण्यात येतील.

केंद्र शासनाच्या उपरोक्त पुरस्कारांचे स्वरुप खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पुरस्काराचे नाव | पुरस्कार संख्या | पुरस्काराचे स्वरुप |
|---|---|---|---|
| १ | राज्य महिला सन्मान | राज्य / केंद्र शासित प्रदेशातून १ | रोख रक्कम ₹४०,०००/- व सन्मान चिन्ह |
| २ | जिल्हा महिला सन्मान | प्रत्येक जिल्हयातून १ | रोख रक्कम ₹२०,०००/- व सन्मान चिन्ह |

२. सदर पुरस्कार प्रत्येक वर्षी जागतिक महिला दिनी म्हणजे दि. ८मार्च रोजी देण्यात येतील. जिल्हा महिला सन्मान पुरस्कारांचे शिफारशीमधून एका शिफारशीची निवड करणे तसेच राज्य महिला सन्मान पुरस्कारासाठी एका नावाची शिफारस करणेसाठी, राज्यस्तरीय छाननी समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय छाननी समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, महिला व बालविकास | अध्यक्ष |
| २ | मा.राज्यमंत्री, महिला व बालविकास | उपाध्यक्ष |
| ३ | मा.प्रधानसचिव,महिला व बालविकास विभाग | सदस्य |
| ४ | मा.आयुक्त,महिला व बालविकास आयुक्तालय | सदस्य सचिव |
| ५ | महिला व बालविकास क्षेत्रात कार्य करणाऱ्या दोन मान्यवर महिला | सदस्य |

जिल्हा महिला सन्मान पुरस्कारासाठी जिल्हास्तरावर खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय निवड समिती गठीत करण्यात येत आहे

**जिल्हास्तरीय छाननी समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी/ विभागीय उपायुक्त | अध्यक्ष |
| २ | जिल्हयातील जिल्हाधिकारी/ विभागीय उपायुक्त यांनी शिफारस केलेल्या २ नामांकित महिला | सदस्य |
| ३ | जिल्हा कार्यक्रम अधिकारी (District Programme Officer) ( District (ICDS) | सदस्य सचिव व बैठकीचे आयोजन करणारे अधिकारी |

३. राज्य महिला सन्मानासाठी अर्ज मागविण्यासाठी राज्य शासन इलेक्ट्रानिक प्रसार माध्यमांच्या वापर करू शकतात. परंतु जिल्हा महिला सन्मानासाठी छापील प्रसार माध्यमाद्वारे अर्ज मागविणे आवश्यक आहे. याकरिता विभागाचे विभागीय उपायुक्त, यांचेस्तरावरून,विभागातील जिल्हयांकरीता एकत्रित जाहिरात देण्यात येईल. सदर जाहिरातीचा खर्च त्यांना उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या जाहिरातीचा खर्च, मुख्य लेखाशिर्ष २२३५ ए ९०१, २६- जाहीरात व प्रसिद्धी या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. सदर पुरस्कारांच्या जाहिरात व प्रसिद्धीसाठी आवश्यक ती अर्थसंकल्पीय तरतूद करण्याची दक्षता आयुक्त,महिला व बालविकास आयुक्तालय,पुणे यांनी घ्यावी.

४. केंद्र शासनाच्या राज्य महिला सन्मान व जिल्हा महिला सन्मान पुरस्कारांसाठी मार्गदर्शक सूचना व पुरस्काराची कार्यपद्धती सोबत जोडलेल्या प्रपत्र " अ " मध्ये नमूद करण्यात आली आहे.प्रस्तावासाठी सादर करावयाचा अर्जाचा विहीत नूमना प्रपत्र " ब "नुसार सोबत जोडण्यात आला आहे. सदर पुरस्कार दिनांक ८ मार्च या महिलादिनी वितरित करण्यात येतील. दोन्ही पुरस्कारांचा खर्च हा केंद्र शासनाकडून करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०४०७१५३५१७६८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Ramchandra Divekar

Digitally signed by Manohar Ramchandra Divekar
DN: CN = Manohar Ramchandra Divekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.04.17 15:25:03 +05'30'

**म.रा.दिवेकर**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सहसचिव, महिला व बाल विकास विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली
५. मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
९. विशेष पोलीस महानिरिक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष), पुणे.
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा, मुंबई.
११. सर्व जिल्हाधिकारी,
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१३. उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१५. सर्व मंत्रालयीन विभाग.
१६. निवड नस्ती/का-१०.

## शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१८८/का-१०, दि.१८ मार्च, २०१५ चे परिशिष्ट

## परिशिष्ट-अ

### केंद्र शासनाचा जिल्हा महिला सन्मान व राज्य महिला सन्मान पुरस्कार याकरिता मार्गदर्शक सूचना

१. पुरस्कार्थी यांनी, एक किंवा अधिक क्षेत्रात विशेषत: आरोग्य आणि स्वच्छता, लिंग समभाव, महिलांची सुरक्षा व अस्तित्व,शिक्षण, पोषण, पर्यावरण जल व्यवस्थापन,सामाजिक सुरक्षितता,यांचेशी संबधित प्रत्यक्ष कार्य अथवा समर्थन, जाणीव जागृती,प्रेरीत करणारे काम समुदाय संघटनाबाबतचे काम महिला सक्षमीकरण, कौशल्य विकास, प्रशिक्षण क्षमता वृद्धीकरण,उदयोजकता वाढ, या क्षेत्रातील कार्य असावे. महिला व मुलीं यांचे जीवन व जीवनमान दर्जा व प्रतिष्ठा यावर परीणाम करणारे असे कोणतेही क्षेत्र किंवा लिंग असमानता स्त्रियांविषयीचा दृष्टीकोन बदलण्यासाठी केलेले नाविन्यपूर्ण कार्यासाठी देखिल पुरस्कार्थींना पुरस्कृत करण्यात येईल.

अ) घर, कामाचे ठिकाण व इतर सार्वजनीक ठिकाण,येथे महिलांवर होणारे अत्याचार व हिंसा हे विशेष विचाराधीन क्षेत्र आहे. अशा घटनांमध्ये व प्रतिकुल परिस्थितीमध्ये असमान्य धैर्य दाखविणाऱ्या महिलांची पुरस्कारासाठी दखल घेण्यात यावी.

ब) सर्वात योग्य,धैर्यवान व कार्याशी वचनबद्ध असणाऱ्या महिलांची दखल घेतली जाईल याची दक्षता घेणे महत्वाचे आहे.

२. अ) पुरस्कार्थींचे वय १ जानेवारी रोजी २१ वर्षापेक्षा अधिक असावे. (पुरस्काराच्या वर्षाचे १ जानेवारी रोजी)

ब) सदर पुरस्कार्थी हे त्या जिल्हयांचे रहिवासीच असले पाहिजे.

क) व त्यांचे त्या जिल्हयात/राज्यात दोन वर्षाहून अधिक कार्य केलेले असावे. सदर पुरस्कार्थींना हा पुरस्कार दिला गेलेला नसावा.

ड) पुरस्कारांकरीता सादर करावयाचा विहीत अर्ज व प्रस्ताव इंग्रजीमध्ये सादर करणे आवश्यक आहे.

३. पुरस्कारासाठी पात्र महिला व मुलींकडून अर्ज मागविणेसाठी आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय,पुणे यांचेकडून आवश्यक पात्रता, निकष व अटी यांचा समावेश असलेली जाहिरात नामांकित वर्तमान पत्रातून व सामाजिक प्रसार माध्यमाद्वारे देण्यात येईल.

अ) जिल्हास्तरीय समिती प्राप्त प्रस्तावामधून प्रथम ३ प्राधान्यक्रम असलेले प्रस्ताव राज्य शासनास पुरस्कारासाठी सादर करेल. राज्यस्तरीय समिती यामधून एकाची निवड करून संबधित जिल्हाधिकारी/विभागीय उपायुक्त व केंद्र शासनाला सादर करेल.

ब) राज्यस्तरीय पुरस्कारासाठी राज्यशासन (महिला व बालविकास विभाग) हीच कार्यपद्धती अवलंबतील.

क) पुरस्कार्थींना देण्यात येणारी पुरस्काराची रोख रक्कम जागतिक महिला दिनाच्या दिवशी, म्हणजे दि. ८ मार्च रोजी, केंद्र शासनाकडून परस्पर त्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात येईल.

ड) जिल्हा सन्मान पुरस्काराचे वितरण नवी दिल्ली येथे केंद्र शासनामार्फत होणाऱ्या समारंभात करण्यात येईल. केंद्र शासनाकडून राज्य महिला सन्मान पुरस्कार्थींना पुरस्कार स्विकारणेसाठी दिल्ली येथे जाण्यासाठी येणारा विमान खर्च व विमानतळापासून कार्यक्रमस्थळी जाण्यासाठी येणारा स्थानिक वाहतूक खर्च, राहण्याचा खर्च याची प्रतिपुर्ती कार्यक्रम स्थळी, पावत्या सादर केल्यानंतर करण्यात येईल.

**४) पुरस्कार प्रक्रियेसाठी वेळापत्रक (अंतिम तारखा)**

| अ.क्र. | कार्यवाही | कार्यवाहीची अंतिम तारीख |
|---|---|---|
| १ | जिल्हास्तरीय व राज्यस्तरीय निवड समिती गठीत करणे | दि.३० सप्टेंबर पर्यंत |
| २ | राज्य शासनाने/ केंद्रशासीत प्रदेश यांनी जाहिरात/ माहिती देणे | दि.१५ ऑक्टोबर पर्यंत |
| ३ | अर्ज/ प्रस्ताव स्विकारण्याची अंतिम तारीख | दि.३ नोव्हेंबर पर्यंत |
| ४ | प्राप्त प्रस्तावांची छाननी व प्रस्ताव पुढील कार्यवाहीस्तव सादर करणे | दि.३० नोव्हेंबर पर्यंत |
| ५ | राज्यस्तरीय समितीकडून शिफारसींचे अंतिमीकरण | दि.१५ डिसेंबर |
| ६ | राज्य शासनाने, केंद्र शासनाला शिफारस केलेल्या प्रस्तावांचा तपशील सादर करणे [नाव व इतर सविस्तर तपशील बँक खात्याच्या तपशीलासह (बँक खाते क्रमांक, शाखा, आय. एफ. एस. सी. कोड इ)] | दि.३१ डिसेंबर |
| ७ | पुरस्कार वितरण | दि.८ मार्च रोजी |

Manohar Ramchandra Divekar

Digitally signed by Manohar Ramchandra Divekar
DN: CN = Manohar Ramchandra Divekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.04.17 15:26:26 +05'30'

**म.रा.दिवेकर**
कार्यासन अधिकारी

## शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१८८/का-१०, दि.१८ मार्च, २०१५ चे परिशिष्ट

## परिशिष्ट-ब

### Application Form

Format for applications Awards

| | | |
|---|---|---|
| i | Name | |
| ii | Date of Birth | |
| iii | Mother◦s Name | |
| iv | Telephone No. (with code) | |
| v | Present address | |
| vi | a.Bank Account number, Bank branch and IFSC code | |
| vii | Field of Work and the location (s) at which you have worked | |
| viii | A description of yourself , your goals and aspirations | |
| ix | Description of work done by you. With timelines, collaborations, impact and outcomes | Please enclose separately as Annexure |
| x | References from two persons who are aware of your work | |

Place :

Date :

Applicants Signature

Manohar Ramchandra Divekar

Digitally signed by Manohar Ramchandra Divekar
DN: CN = Manohar Ramchandra Divekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.04.17 15:27:52 +05'30'

म.रा.दिवेकर
कार्यासन अधिकारी